**कवि कुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठामधील रिक्रीएशन सेंटर व ॲकॅडमिक रिचर्स सेंटरच्या इमारत बांधकामासाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षातील निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक: केएसयु - २००९/(१५६/०९)/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २०१०.

**पहा** :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. केएसयु- २००८/(३७/०८)/ विशि-२, दि. २९ मार्च, २००८
२) शासन निर्णय क्र. केएसयु-२००८/(२७६)/विशै-१, दि. ३०.३.२००९
३) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण क्र. युएनआय-२००८/संस्कृत विद्या./ यो.यो/विशि-१, ६८९७, दि. १.२.२०१०

**प्रस्तावना** : कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक , जि. नागपूर या विद्यापीठामध्ये ॲकॅडमिक रिसर्च सेंटरच्या बांधकामास रु. ५,१३,६६०००/- इतक्या अंदाजपत्रकीय खर्चास व आराखडयास प्रशासकीय मान्यता संदर्भिय क्र. १ या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली आहे. उपरोक्त प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने सन २००८- ०९ या आर्थिक वर्षात सदर विद्यापीठाच्या ॲकॅडमिक रिसर्च सेंटरच्या इमारत बांधकामासाठी वितरीत केलेले रुपये ७० लाख मंजूर केलेले असून ते विद्यापीठास वितरीत करण्यात आलेले आहे. सन २००८-०९ या आर्थिक वर्षात रु. ४४.९९४ लक्ष एवढी रक्कम यापूर्वीच संदर्भिय क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रदान केल्यानंतर सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी योजनांतर्गत योजनेसाठी सदर विद्यापीठाच्या बांधकामास तरतूद वजा जाता उर्वरित रु. २३,३३,०००/- एवढी तरतूद लेखा अनुदानात मंजूर झालेली आहे. सदर योजनांतर्गत योजनेसाठी कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक या विद्यापीठामध्ये ॲकॅडमिक रिसर्च सेंटरच्या बांधकामाच्या खर्चासाठी रु. २३,३३,०००/- (रुपये तेवीस लाख तेहतीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- प्रस्तावनामध्ये नमूद केलेल्या कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक , जि. नागपूर या विद्यापीठामध्ये ॲकॅडमिक रिसर्च सेंटरच्या बांधकामासाठी या शासन निर्णयान्वये सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी रुपये २३,३३,०००/- (रुपये तेवीस लाख तेहतीस हजार फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर निधी कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक बांधकामासाठी वितरीत करण्याचे संचालक उच्च शिक्षण यांनी संदर्भिय क्र. ३ येथील पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. त्यानुसार सदर रुपये २३,३३,०००/- (रुपये तेवीस लाख तेहतीस हजार फक्त) एवढा निधी कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक , जि. नागपूर या विद्यापीठामध्ये ॲकॅडमिक रिसर्च सेंटरच्या बांधकामास वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार

असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, - (००) (१४) संत कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठाचा विकास (२२०२ ३४९५), ३१ सहाय्यक अनुदान " या लेखाशिर्षाखाली खर्च घालण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००२२६१४५११५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कुलगुरु, कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक , जि. नागपूर.
४) कुलसचिव, कवीकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक , जि. नागपूर.
५) सहसंचालक ( उच्च शिक्षण) नागपूर विभाग, नागपूर.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती (विशि-२)